महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली
सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना
अनुज्ञेय रक्कम मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः मगौपु-२०१४/७०३/(प्र.क्र.२३९/१४)/२८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: -२२/०८/२०१४.

**वाचा**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शौपपु २०००/३०३/प्र.क्र.३१(२०००)/२८, दिनांक ०३.०७.२०००.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शौपपु-२००१/२८९८/प्र.क्र.१६(२००२)/२८, दिनांक १६.०८.२००२.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शौपपु-२००८/प्र.क्र.४९/२८,दिनांक ०७.०५.२०११.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. मगौपु-२०१२/१६४४/प्र.क्र.५३६/२८,दिनांक ०४.०१.२०१३.
५) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६२११/गौ.पु/प्रस्ताव/सैकवि-१६/२८७३, दिनांक १६.०७.२०१४.

**प्रस्तावना**

संदर्भाधीन अ. क्र. (१) (२) (३) येथील शासन निर्णयांद्वारे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत सैन्यातील १४ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना शासकीय अनुदान देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. एअर मार्शल, धनंजय परशुराम जोशी यांना राष्ट्रपती सचिवालयाच्या अधिसूचना क्र.७-प्रेस/२०१४, दिनांक २६ जानेवारी, २०१४ अन्वये “ परम विशिष्ट सेवा पदक” प्रदान करण्यात आले आहे. सदर लाभार्थ्यास यापूर्वी अतिविशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ रक्कम रु.८५,०००/- इतके, शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.मगौपु-२०१२/१६४४/प्र.क्र.५३६/२८, दिनांक ०४.०१.२०१३ नुसार अदा करण्यात आलेले आहेत. संदर्भाधीन अ. क्र. (१), (२) व (३) येथील शासन निर्णयांमधील तरतूदीनुसार त्यांना परम विशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ देण्यात येणारी अनुज्ञेय एकूण रक्कम रु.१,७०,०००/- यामधून अति विशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ देण्यात आलेली रक्कम रु. ८५,०००/- वजा जाता, उर्वरीत रक्कम रु.८५,०००/-, सदर योजनेंतर्गत देण्याबाबतचा प्रस्ताव

संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांच्या दिनांक १६.०७.२०१४ च्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाला असल्याने तद्नुषंगाने अनुज्ञेय रक्कम लाभार्थ्यांस मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय

उपरोक्त नमूद संदर्भाधिन शासन निर्णय व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली रु.८५,०००/- (रुपये पंच्याऐंशी हजार फक्त) इतकी अनुदानाची रक्कम खाली नमूद केल्याप्रमाणे देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | अनुदानाची देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | १३९०५ बी,<br>एअर मार्शल धनंजय परशुराम जोशी,<br>पी व्ही एस एम, ए व्ही एस एम,<br>ई ८१६, साळुंखे विहार, आर्मी वेलफेअर कोऑपरेटीव्ह हाऊसिंग सोसायटी, कोंढवा, पुणे - ४११ ०२२. | परम विशिष्ट सेवा पदक | २६.०१.२०१४ | ८५,०००/- |

२. या प्रयोजनार्थ होणारा रु.८५,०००/- (रुपये पंच्याऐंशी हजार फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० - इतर खर्च, (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११ ३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. वरील तक्त्यात नमूद केलेली संबंधित रक्कम लाभार्थ्याची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व तत्संबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शौपपु-२०००/३०३/प्र.क्र.३१(२०००)/२८, दिनांक ०३.०७.२००० व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शौपपु-२००१/२८९८/प्र.क्र.१६(२००२)/२८, दिनांक १६.०८.२००२ तसेच शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शौपपु-२००८/प्र.क्र.४९/२८, दिनांक ०७.०५.२०११ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१२५७११६३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Pandurang Musale

Digitally signed by Sanjay Pandurang Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Pandurang Musale
Date: 2014.08.22 12:54:19 +05'30'

(सं.पां.मुसळे)

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

३) मा.मुख्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,

४) मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,

५) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (शाखा ड-५/ड-६)(२ प्रती),

६) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

८) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,

९) कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

१०) जिल्हाधिकारी, पुणे,

११) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

१२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),

१३) जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे,

१४) सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई,

१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

१६) एअर मार्शल धनंजय परशुराम जोशी, ई ८१६, साळुंखे विहार, आर्मी वेलफेअर को ऑपरेटीव्ह हाऊसिंग सोसायटी, कोंढवा, पुणे - ४११ ०२२.

१७) वित्त विभाग (व्यय ४), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१८) सामान्य प्रशासन विभाग/कार्या.२५, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१९) सामान्य प्रशासन विभाग/कार्या.१९-अ, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

२०) प्रत संग्रहार्थ.